**मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन मार्फत राबविण्यात येत असलेल्या मुंबई मेट्रो मार्ग-३ प्रकल्पासाठी भारतीय स्टेट बँकेकडून रु.१००० कोटी रक्कमेचे ब्रीज लोन घेण्यात येणा-या / आलेल्या कर्जाच्या रकमेस शासन हमी रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : शाहमी-२०२४/ नविवि/प्र.क्र.६४/अर्थबळ,**
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक :- १७/०५/२०२४

**वाचा** - १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. शाहमी-१०९९/प्रक्र.६८/शा.हमी, दि. ५.११.१९९९
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. शाहमी -१००८/प्रक्र.१८/शा.हमी, दि.२८.४.२००८
३) शाहमी-२०२३/ नविवि/प्र.क्र. ६४/अर्थबळ, मंत्रालय, मुंबई-३२,दि.०८.०९.२०२३
४)शुध्दीपत्रक- शाहमी-२०२३/ नविवि/प्र.क्र. ६४/अर्थबळ, मंत्रालय, मुंबई-३२ दि.०५.०१.२०२४
५) व्यवस्थापाकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल कॉर्पो. लि. यांचे पत्र क्र. एमएमआरसी/एफ ॲण्ड/जीओएम/२०२३-२४/१०२९ दि. २३.०४.२०२४
६)महाप्रबंधक भारतीय स्टेट बँक यांचे पत्र CAG BKC/AMT-२/२०२४-२५/०१७ दि. २२.०४.२०२४

**प्रस्तावना:**

मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली उच्चाधिकार समितीने दि. ११.१२.२०२३ रोजीच्या बैठकीत मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन मार्फत राबविण्यात येत असलेल्या मुंबई मेट्रो मार्ग-३ साठी रु. १००० कोटी रकमेचे ब्रीज लोन घेण्यासाठी बिनशर्त, अपरिवर्तनीय स्वरूपातील, कायदेशीररित्या अंमलबजावणीयोग्य राज्य शासनाची हमी देण्यास व सदर हमीवरील हमी शुल्कास माफ करण्यास मंजुरी देण्यात आली आहे. या अनुषंगाने वित्त विभागाने अनु. क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन मार्फत राबविण्यात येत असलेल्या मुंबई मेट्रो मार्ग-३ साठी भारतीय स्टेट बँकेकडून रु. १००० कोटी रकमेचे ब्रीज लोन घेण्यासाठी बिनशर्त, अपरिवर्तनीय स्वरूपातील, कायदेशीररित्या अंमलबजावणीयोग्य राज्य शासनाची हमी देण्यास व सदर हमीवरील हमी शुल्कास माफ करण्यास मंजूरी दिली आहे. अनु. क्र ४ येथील शासन निर्णयान्वये शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल. व्यवस्थापाकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल कॉर्पो. लि. यांनी अनु. क्र. ५ येथील पत्रान्वये भारतीय स्टेट बँकेकडून घेण्यात आलेले ब्रीज लोनची परतफेड केली असून या संदर्भात देण्यात आलेली बँक गॅरंटी आवश्यक नाही. सबब, वित्त विभागाच्या अनु क्र. ३ व अनु. क्र. ४ येथील शासन निर्णय रद्द करण्यात येऊन प्रकरण बंद करण्यात यावे असे कळविले आहे. या अनुषंगाने शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

**शासन निर्णय :**

मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन मार्फत राबविण्यात येत असलेल्या मुंबई मेट्रो मार्ग-३ साठी भारतीय स्टेट बँकेमार्फत रु. १००० कोटी रकमेचे कर्जास बिनशर्त, अपरिवर्तनीय स्वरूपातील, कायदेशीररित्या अंमलबजावणीयोग्य राज्य शासनाची हमी देण्याबाबत व सदर हमीवरील हमी शुल्क माफ करण्यास मंजुरी देण्याबाबत वित्त विभागामार्फत निर्गमित करण्यात आलेला अनु. क्र.३ आणि अनु. क्र. ४ येथील शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०५१७११४२४६१४०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL RAJARAM RANE

Digitally signed by ANIL RAJARAM RANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=5a11e07460e3a6c033ae4a8736edbd8f5ac6cdbcd1b538f0181f4ea79fcd3a20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1B25926A747A296C372CFA0C033BBC4DAED79C98E881C0DB699D87C4642743C4, cn=ANIL RAJARAM RANE
Date: 2024.05.17 11:55:24 +05'30'

**( अनिल राणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) सर्व सन्माननिय सदस्य विधानपरिषद/ विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
८) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
९) उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
१०) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१२) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१३) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय, मुंबई, (५प्रती)
१४) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक्स क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईन्ट, मुंबई-४०० ०२०.
१५) इंडियन नॅशनल कॉग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०००२५.
१६) नॅशनॅलिस्ट कॉग्रेस पार्टी, ठाकरसी हाऊस, जे.एन. हेरेडीया मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई.
१७) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०००२८.
१८) बहुजन समाज पार्टी,म.रा.,बी.एस.पी. भवन, प्लॉट नं.८३-ए,कलेक्टर कॉलनी चेंबूर, मुंबई-४०००१४.
१९) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राज भवन, एस.व्ही. पटेल रोड, मुंबई-०४.
२०) भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पार्टी महाराष्ट्र कमिटी,जनशक्ती हॉल,ग्लोब मिल पॅलेस, वरळी,मुंबई-२८.
२१) महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर शिवाजी पार्क, दादर, मुंबई-२८.
२२) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२३) व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रे कॉर्पोरेशन लि., एमएमआरसी ट्रान्सिट ऑफीस बिल्डींग, ए-विंग, ई-ब्लॉक, आयकर विभाग कार्यालयाच्या मागे, वांद्रे कुर्ला संकुल, वांद्रे पूर्व, मुंबई-४०० ०५१.
२४) वित्त विभाग (साउ / व्यय-३ / ऋण व हमी नियंत्रण कक्ष), मंत्रालय, मुंबई.
२५) कार्यासन अधिकारी-नवि-७, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई--४०० ०३२.
२६) संबंधित वित्तीय संस्था (विभागामार्फत).
२७) निवड नस्ती -अर्थबळ.